कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिनस्त असलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाची हेल्पलाईन पुढे चालू ठेवण्यासाठी येणा-या खर्चास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उदयोजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कौविउ-२०१७/प्र.क्र.१०३/रोस्वरो-१**
२रा मजला मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
तारीख: २९ मे, २०१७

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः कौशल्य विकास व उद्योजकता विभाग क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.२७१/रोस्वरो-१ दि.१६.११.२०१६**
२) **आयुक्त, कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र.कौविरोवउसं-७/२२२(१४/२)/३०९२ दि.१८ एप्रिल,२०१७**

प्रस्तावना -

सर्वकष ई-प्रशासन प्रणाली प्रकल्पांतर्गत आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयासाठी विकसित केलेल्या www.maharojgar.gov.in या वेबपोर्टलचा लाभ घेता लाभार्थ्यांना येणा-या अडचणीचे निराकरण करण्यासाठी सुरु करण्यात आलेली हेल्पलाईन माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या सिटीझन कॉन्टॅक्ट सेंटरचा वापर करुन ( मे.सार आयटी रिसोर्सेस प्रायव्हेट लिमिटेड यांचेमार्फत कार्यान्वित) दि.२७ ऑक्टोबर,२०१६ ते ३१ मार्च,२०१७ या कालावधीत चालू ठेवण्यास संदर्भाधिन शासन निर्णय दि.१६.११.२०१६अन्वये मान्यता देण्यात आली होती. सदर हेल्पलाईन (१८६०२३३०१३३) दि.१ एप्रिल,२०१७ पासून पुढे चालू ठेवण्यासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांनी दि.१८ एप्रिल,२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

दि.१४.०९.२०१५ रोजी झालेल्या कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या संगणकीकरण प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार दि.०१ एप्रिल,२०१७ पासून कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिनस्त असलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाची हेल्पलाईन सिटीझन कॉन्टॅक्ट सेंटरचा वापर करुन (मे.सार आयटी रिसोर्सेस प्रायव्हेट लिमिटेड यांचेमार्फत कार्यान्वित) पुढे चालू ठेवण्यास तसेच यासाठी सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षामध्ये होणा-या खालील विवरणपत्रात दर्शविलेल्या कालावधीकरिता रु.४,७३,७१२/- ( रुपये चार लाख त्र्याहत्तर हजार सातशे बारा फक्त) च्या खर्चास वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | कालावधी | एकूण प्रत्यक्ष खर्च (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | हेल्पलाईन ( क्र.१८६०२३३०१३३) कार्यान्वयन व व्यवस्थापन खर्च-३ मनुष्यबळ सीटसाठी प्रति मनुष्यबळ रु.३०,२४०/- अधिक १५ टक्के सेवा कर | दि.०१.०४.२०१७ ते दि.३१.०७.२०१७ या कालावधीसाठी (दर महा तीन सीट साठी रु.१,०४,३२८ प्रमाणे ४ महिन्यासाठी) | ४,१७,३१२/- |
| २ | एमटीएनएल पीआरआय लाईन (क्रमांक २८७२०२२७) दरमहा शुल्क रु.९,०००/- अधिक सेवा कर १५ टक्के एकूण रु.१०,३५०/- | १.दि.०१.०४.२०१७ ते दि.३१.०७.२०१७ रु.१०३५०X४ महिने | ४१,४००/- |
| | | २.संकीर्ण खर्च ( सरचार्ज, आऊट गोईंग कॉल चार्जेस इ) | १५,०००/- |
| | (एकूण रुपये चार लाख त्र्याहत्तर हजार सातशे बारा फक्त) | | ४,७३,७१२/- |

२. सदर मान्यता ही खालील अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे

1) सदर खर्च सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात संगणकीकरणासाठी अर्थसंकल्पित/मंजूर व उपलब्ध अनुदानातून लेखाशीर्ष : मागणी क्रमांक झेड-१,२२३० कामगार व सेवयोजन ०२, सेवायोजन सेवा, ००१ संचालन व प्रशासन (०२)(०१) सेवायोजन कार्यालयात संगणित्राची पध्दती सुरु करणे ( २२३० १०९२),१३ कार्यालयीन खर्च (योजनांतर्गत) खाली भागविण्यात यावा.
2) शासन निर्णय दि.०२.०९.२०१५ नुसार विभागामार्फत कार्यरत असलेल्या महारोजगार, महास्वयंरोजगार व महाकौशल्य या तिन्ही वेबपोर्टलची सांगड घालण्याची कार्यवाही महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्थेमार्फत करण्यात येत आहे. सबब, तिन्ही वेबपोर्टलसाठी एकच हेल्पलाईन सुरु ठेवण्याच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्थेच्या सहयोगातून दि.०१ ऑगस्ट,२०१७ ते दि.३१ मार्च,२०१८ या कालावधीत सदर हेल्पलाईन कशाप्रकारे पुढे चालू ठेवणे शक्य होईल. याबाबतचा प्रस्ताव शासनास दि.२० जून,२०१७ पूर्वी सादर करण्याची आणि सदर प्रस्तावास विभागाच्या संगणकीकरण प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता दि.१० जुलै,२०१७ पूर्वी घेण्याची जबाबदारी आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांची राहील.
3) प्रकरणी कार्यवाही करताना माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल,२०१५ प्रमाणे वित्तीय नियमपुस्तिका १९७८ भाग-पहिला , उपविभाग तीन अ.क्र.४ परिच्छेद २७(२)(ब) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२९१५२९२३८२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S.G. Patil

Digitally signed by S.G. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SDED, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f64f9296da4ba15d02d3ad3826a21a74ed080355ac04eef5617c3b4f08af47ae, cn=S.G. Patil
Date: 2017.05.29 15:31:39 +05'30'

**(सं गि.पाटील)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल,महाराष्ट्र ½ ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
२. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकणभवन, नवी मुंबई
३. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई
४. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई
५. कक्ष अधिकारी (रोस्वरो-२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
६. वित्त विभाग (व्यय-६),मंत्रालय, मुंबई
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे
९. निवडनस्ती ,रोस्वरो-१